

# समर्थशिष्य योगिराज
# श्री कल्याण स्वामी चरित्र



: लेखक :

सचिन अशोक जहागिरदार



श्री कल्याण स्वामींची डोमगाव येथील समाधी व मंदीरातील श्री राम पंचायतन



श्रीराम॥श्रोतेपुसतीकोणग्रंथ।कायबोलिलेंजीयेथ।
श्रवणेंकेलियातेंप्राप्त।कायआहे।१।ग्रंथानामदासबो
ध।गुरुशिष्यांचासंवाद।येथबोलिलाविशदभक्ति
मार्ग।२।नवविधाभक्तिआणिज्ञान।बोलिलेंवैराग्या
चेलक्षण।बहुधाअध्यात्मनिरोपणनिरोपीलें।३।भ
क्तिचेनयोगेंदेव।निश्चयेंपावतिमानव।ऐसाआहेअ
भिप्रावईयेग्रंथीं।४।मुख्यभक्तिचानिश्चयो।शुद्धज्ञाना

डोमगाव येथील समाधी मंदीरातील श्री कल्याण स्वामींच्या हस्ताक्षरातील दासबोध






श्री कल्याण स्वामी आपल्या दंडावर मारुती बांधत असत. या मारुतीचा आकार २.५ इंच x २.५ इंच आहे. यावरुन श्री कल्याण स्वामींच्या बलदंड शरीराची कल्पना येते.



हेच ते अगडबंब हंडे ज्याचे एकेकाचे रिकामे असतानाचे वजनही सुमारे १८ किलो भरते. हे दोन्ही एकत्र भरुन, त्याची कावड करुन शिष्योत्तम कल्याण स्वामी सज्जनगडाच्या पायथ्यापासून ते मठापर्यंत स्वतः खांद्यावरुन वाहून आणत असत.

|| श्री राम समर्थ ||
|| जय जय रघुवीर समर्थ ||

# समर्थशिष्य योगिराज
# श्री कल्याण स्वामी चरित्र



- लेखक -
**सचिन अशोक जहागिरदार**

**श्री कल्याणस्वामी पुण्यतिथी त्रिशताब्दि वर्ष - २०१३-२०१४**
**युगाब्द ५११५ - ५११६**

# प्रस्तावना

समर्थ सांप्रदायामध्ये कल्याण स्वामींना समर्थ रामदास स्वामींनंतरचे प्रथम स्थान आहे. गुरुशिष्य परंपरेत श्री समर्थ रामदास स्वामी व शिष्यवर श्री कल्याण स्वामी हे गुरुशिष्य एकमेवाद्वितीय आहेत. समर्थ रामदास स्वामींबद्दल बरीचशी ग्रंथसंपदा पूर्वीपासूनच उपलब्ध आहे. अनेक समर्थ भक्तांनी श्री समर्थांचा विविध अंगांनी गाढा अभ्यास करुन विविध प्रकारे चरित्र लिहिले आहे. वयाच्या १२ व्या वर्षापासून श्री कल्याण स्वामी समर्थांच्या बरोबर सावली प्रमाणे सोबत होते. बहुतांश लोकांना कल्याण स्वामी म्हणजे सज्जनगडावर समर्थांसाठी पाणी वाहणारे शिष्य फारतर समर्थ रामदास स्वामींचे कवितासागर लिहिणारे लेखनिक एवढीच ओळख होती. श्री कल्याण स्वामींबद्दल विस्ताराने जास्त कोठे लिहिले गेले नाही. सचिन जहागिरदारांनी हे जे पुस्तक लिहिले आहे ते सर्व समर्थभक्तांना श्री कल्याण स्वामींच्या अधिक जवळ नेऊन ठेवते. सचिनने ओघवत्या भाषेत अबालवृद्धांना समजेल अशा सहज सुंदर गोष्टीरुपाने श्री कल्याण स्वामींचे चरित्र लिहिले आहे. ज्याची आज अत्यंत आवश्यकता होती. सचिन जहागिरदार हा कल्याण स्वामी मठ डोमगाव परंपरेतील असल्यामुळे अधिक आंतरिक तळमळीने, अभ्यासाने या पुस्तकाचे लिखाण केले आहे. त्यामुळेच ते अंर्तमनाला जावून स्पर्श करते.

डोमगावी फारशी माहिती नसलेला भक्त आल्यानंतर कल्याण स्वामींबद्दल अधिक कुतूहल निर्माण होते. तेव्हा कल्याण स्वामी कोण ? ते कसे समर्थांचे पट्टशिष्य झाले ? कल्याण स्वामींना 'कल्याण' हे नांव कसे पडले ? गुरुशिष्यांचे नाते अस्थिविसर्जनापर्यंत कसे अभेद्य होते तसेच गुरुचा शिष्यावर तसेच शिष्याचा गुरुवर किती समर्थ अधिकार असतो या सर्व कुतुहलाची फुल उमलावे तशी उकल हे पुस्तक करते. म्हणूनच हे पुस्तक अबालवृद्धांना आवडेल यात शंका नाही.

या पुस्तकाचे अजून एक वैशिष्ट्य म्हणजे डोमगाव जेथे श्री कल्याण स्वामींची स्वयंभू समाधी आहे तेथे कसे जावे याची समग्र माहिती या पुस्तकात सचिनने दिली आहे. म्हणून हे पुस्तक डोमगावला जाण्यासाठी सर्व भक्तांना ''मार्गदर्शक'' ठरेल यात तिळमात्र शंका नाही. दुग्धशर्करा योग असा की, हे चरित्र श्री कल्याण स्वामींची सन २०१३-२०१४ हे वर्ष पुण्यतिथी त्रिशताब्दि महोत्सवी वर्ष आहे. या वर्षात प्रथमच प्रकाशित होत आहे व पुस्तक प्रकाशनाचा सन्मान श्री दासनवमी महोत्सव समितीला मिळत आहे याचा आम्हाला सार्थ अभिमान आहे. श्री कल्याण स्वामींच्या या चरित्र ग्रंथाच्या निर्मितीबद्दल सर्व समर्थभक्त व कल्याण भक्तांकडून सचिन अभिनंदनास पात्र आहे.

जय जय रघुवीर समर्थ ।।

**- अजय कुलकर्णी**

समन्वयक, श्री दासनवमी महोत्सव समिती, बार्शी

# सकळ करणे जगदिशाचे....

श्री समर्थ रामदास स्वामी आणि त्यांचे पट्टशिष्य योगिराज श्री कल्याण स्वामी हे दोघे देहाने जरी भिन्न असले तरी अंतरंगी पूर्णतः एकरुप झालेल्या त्या दोन महान विभूती होत्या. श्री कल्याण स्वामींनी स्वतःला संपूर्णपणे श्री समर्थचरणी अर्पित केले होते. गुरुशिष्यांची ही जोडी म्हणजे भारतीय संस्कृतीचे एक शिखर होय. रामायणामध्ये हनुमंताचे जे स्थान तेच स्थान श्री समर्थ चरित्रामध्ये श्री कल्याण स्वामींचे आहे. समर्थ शिष्योत्तम श्री कल्याण स्वामींचे यथामती चरित्रलेखन हाच या छोट्या पुस्तिकेचा हेतु आहे.

श्री कल्याण स्वामींच्या ३०० व्या पुण्यतिथीच्या निमित्ताने केलेले हे लेखन श्री समर्थ - श्री कल्याण स्वामींच्या कृपेनेच पूर्ण झाले आहे.

**रघुनाथ स्मरोनी कार्य करावे । ते तत्काळची सिद्धी पावे ।**

**कर्ता राम असो द्यावे । अभ्यंतरी ।।**

हे लेखन पूर्ण करण्यासाठी मला आई ति. सौ. मीना व वडील ति. अशोक जहागिरदार यांचे आशीर्वाद मिळाले. त्याचप्रमाणे माझा लहान भाऊ चि. सागर याचेही वेळोवेळी सहकार्य लाभले.

या चरित्राच्या प्रकाशनाचे दायित्व श्री दासनवमी महोत्सव समिती, बार्शीचे समन्वयक व उद्योजक समर्थभक्त श्री अजयराव कुलकर्णी यांनी घेतले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. डोमगाव मठाचे मठपती श्री अविनाशबुवा जहागिरदार, श्री भाऊसाहेब महाराज जहागिरदार, रामदासी सांप्रदायाचे अभ्यासक, लेखक श्री प्रमोदजी संत, नागपूर, श्री रमणजी चितळे, पुणे या ज्येष्ठांनी वेळोवेळी मार्गदर्शन केले. श्री शिवराम राजाराम तथा संजय रामदासी (डोमगांवकर), श्री संजय लक्ष्मण देशपांडे यांनी वेळोवेळी प्रोत्साहन दिले. त्यांचा मी सदैव ऋणी आहे.

बार्शी येथील साई प्रिंटिंग प्रेसचे श्री गिरीश व महेश अर्जुन सोनार यांनी हे लेखन सुबक पद्धतीने छापून दिले त्याबद्दल त्यांचे आभार.

आपली भारतभूमी ही 'बहुरत्ना वसुंधरा' आहे. ह्या भारतमातेच्या उदरातून अनेक नररत्ने जन्मास आली व आपल्या कर्तृत्त्वाने त्यांनी सर्व मानव जातीला धन्य केले. मी माझी ही छोटीशी लेखनकृती त्या पवित्र पुण्यभूमी भारतमातेच्या चरणी अर्पित करतो.

**- सचिन जहागिरदार**

# जन्म आणि बालपण

नाशिक जवळील भोगुर गावचे कुलकर्णी कृष्णाजीपंत यांचा विवाह झाला व त्यांना अपत्य प्राप्ती झाली. परंतु दुर्दैवाने त्यांची पत्नी व ते अपत्य थोड्याच कालावधीमध्ये मृत्यु पावले. ऐन तारुण्यामध्ये झालेल्या या आघातांमुळे कृष्णाजीपंत गावातील सर्व निरवानिरव करुन तीर्थाटनासाठी बाहेर पडले. अनेक तीर्थक्षेत्रांना भेटी देत ते श्री महालक्ष्मीच्या दर्शनासाठी कोल्हापूरला आले.

कोल्हापूरमध्ये बरवाजीपंत कुलकर्णी नावाचे एक गृहस्थ होते. त्यांच्या बहिणीचा विवाह व्हावयाचा होता. ते त्या चिंतेमध्ये होते. पूर्वसंचितानुसार कृष्णाजीपंत व बरवाजीपंत यांची भेट झाली. बरवाजीपंतांची विनंती मान्य करुन कृष्णाजीपंतांनी त्यांच्या बहीणीशी - रखुमाबाईंशी विवाह करण्यास मान्यता दिली. तसेच कांही काळानंतर पुन्हा तीर्थयात्रा करण्याचा मनोदयही सांगितला. यानुसार बरवाजीपंतांची भगिनी रखुमाबाई आणि कृष्णाजीपंत कुलकर्णी यांचा विवाह झाला. श्री महालक्ष्मीच्या कृपेने झालेल्या या विवाहसोहळ्यात पुढील इतिहासाची बीजे होती.

कोल्हापूरच्या अंबाबाईच्या कृपेने या दाम्पत्याला पहिला मुलगा झाला. त्याचे नांव अंबाजी असे ठेवण्यात आले. अंबाजीचे जन्मवर्ष इ. स. १६३६ असावे. अंबाजीनंतर झालेल्या दुसऱ्या मुलाचे नांव दत्तात्रय असे ठेवण्यात आले. या दोघांना एक बहिणही होती असा उल्लेख एका ठिकाणी सापडतो. कांही वर्षे प्रपंच केल्यानंतर कृष्णाजीपंत पुन्हा एकदा तीर्थाटनासाठी बाहेर पडले. पुढे त्यांनी काशीस जाऊन संन्यास घेतला. नंतरच्या इतिहासामध्ये त्यांचा उल्लेख आढळत नाही. त्यानंतर ही मुले व त्यांची आई आपल्या माहेरी भावाकडे परत आली.



# कोल्हापुरास श्री समर्थांचे आगमन व गुरु शिष्यांची भेट

साधारणतः सन १६४५ चा कालावधी होता. १२ वर्षांचे भारतभ्रमण पूर्ण करुन श्री समर्थ रामदास स्वामी त्यांच्या कर्मभूमीमध्ये परत आले होते. १२ वर्षांच्या कठोर तपाने व तेवढ्याच काळ केलेल्या तीर्थाटनाने श्री समर्थांनी कांही निश्चय केला होता - तो होता धर्मसंस्थापनेचा.

समाजाला धर्ममार्गाला लावण्यासाठी जागोजागी त्यांची कीर्तने होत असत. ओजस्वी वाणी, प्रखर वैराग्य, सखोल अभ्यास, रसाळ निरुपण इत्यादिंनी युक्त अशा कीर्तनांमध्ये जनसागर लोटत असे. अशीच कीर्तने कोल्हापुरामध्येही चालू होती. ही कीर्तने ऐकण्यासाठी बरवाजीपंत देखील येत असत. श्री समर्थांचे कीर्तन ऐकून याच सत्पुरुषाला आपण आपले सद्‌गुरु करुन त्यांचे शिष्यत्व ग्रहण करावे अशी इच्छा बरवाजीपंतांना झाली. त्यासाठी त्यांनी श्री समर्थांना विनंती केली. समर्थांनीही त्यांची पारख करुन अनुग्रह देण्याचे मान्य केले.

ठरलेल्या दिवशी समर्थ रामदास स्वामी बरवाजीपंतांच्या घरी आले. घरात मंगलमय वातावरण होते. रांगोळ्या, तोरणे यांनी तो वाडा सजवलेला होता. श्री समर्थांचे आगमन होताच बरवाजीपंतांच्या आनंदाला पारावार उरला नाही. समर्थ रामदास स्वामींनी बरवाजीपंतांना अनुग्रह देऊन कृतार्थ केले. परंपरेप्रमाणे बरवाजीपंतांनी श्री समर्थांना गुरुदक्षिणा स्वीकारण्याची विनंती केली. परंतु सोने आणि माती यांना समदृष्टीने पाहणाऱ्या ब्रह्मनिष्ठ समर्थांना यातील कांहीच नको होते. त्यांनी नकार दिला. परंतु बरवाजीपंतांनी त्यांना फारच आग्रह केला. तेंव्हा समर्थ म्हणाले, ''द्यायचेय असेल तर रामकार्यासाठी 'अंबाजी' दे.''



घरामध्ये आल्यापासून समर्थांचे परिक्षण चालू होते. दहा-बारा वर्षांचा अंबाजी तोरणे लावत होता, सगळीकडे धावपळ करत होता. अनुग्रह आणि भिक्षेच्या निमित्ताने आलेल्या समर्थांच्या दृष्टीला हा चुणचुणीत मुलगा सापडला.

समर्थांनी मागितलेली ही गुरुदक्षिणा ऐकून बरवाजीपंत एक क्षण स्तंभित झाले. पण पुढच्याच क्षणी ते म्हणाले, ''महाराज, हा मुलगा जर माझा असता तर मी दिला असता. पण हा माझ्या बहिणीचा मुलगा आहे. तिला विचारले पाहिजे.'' समर्थांनी एका कोपऱ्यात उभारलेल्या त्या माऊलीकडे पाहिले. ती म्हणाली, ''महाराज, एकटा अंबाजीच का ? दत्तात्रय व माझ्यासह आम्हा तिघांनाही अनुग्रह देऊन आपल्या सोबत धर्मकार्यास घेऊन चला.'' समर्थांनाही प्रसन्नता वाटली. मग अंबाजी, दत्तात्रय व त्यांची माता हे समर्थांच्या मागोमाग निघाले.

**शिरगाव येथे मठ स्थापना :** कांही काळ गेल्यानंतर साताऱ्याजवळ शिरगांव येथे समर्थांनी दत्तात्रय स्वामींना मठ स्थापन करुन दिला. गृहस्थाश्रम स्वीकारुन धर्मकार्य करण्यास सांगितले. त्यांच्या मातोश्री ही शिरगांव येथेच राहिल्या. दत्तात्रय स्वामींच्या मुलाचे नांव राघव. त्याची मुंज समर्थांच्या मांडीवर लागली.



# अंबाजीचे कल्याण झाले

अंबाजी मात्र आजन्म समर्थसेवेमध्ये राहिले. अंबाजी हे 'योगभ्रष्ट' असल्याचा अनेक ठिकणी उल्लेख येतो. केवळ कांही कर्म शिल्लक राहिल्याने ज्या मुक्तात्म्यांना जन्म घ्यावा लागतो त्यांना 'योगभ्रष्ट' असे म्हणतात.

महाराष्ट्रामध्ये परत आल्यावर समर्थ रामदास स्वामींनी धर्मस्थापना करण्यासाठी रामजन्मोत्सव सुरु केले. असाच एक रामजन्मोत्सव साताऱ्या जवळील मसूर या गावी होता. रामनवमीच्या दिवशी मोठी रथयात्रा होती. अत्यंत उत्साहामध्ये रथ निघाला होता. इतक्यात तो रथ एका झाडाजवळ जावून अडला. त्या झाडाची फांदी आडवी आली होती. रथ पुढे जाण्यासाठी ती फांदी तोडावी लागणार होती. पण अडचण अशी होती की, ती फांदी एका खोल विहीरीवर होती. जो कोणी ती फांदी तोडेल तो त्या विहीरीमध्ये पडणार होता. अशा बिकट प्रसंगी अंबाजी पुढे आले. काही क्षणातच ते झाडावर चढले व कुऱ्हाडीच्या घावांनी त्यांनी ती फांदी तोडली. काड्कन आवाज होवून ती फांदी विहीरीत पडली. फांदीसह अंबाजी ही विहीरीत पडले. रस्ता मोकळा झाला. प्रभु श्री रामचंद्रांच्या जयघोषात रथ पुढे गेला. उत्सव संपन्न झाला.



संध्याकाळी सर्वांना अंबाजीचे स्मरण झाले. सकाळी विहीरीत पडल्यापासून ते वर आले नव्हते. अनेकांना वाटले नक्कीच अंबाजीचे कांही बरे वाईट झाले असणार. अन्य सर्व शिष्यांनी समर्थांना प्रार्थना केली व अंबाजीचे काय करायचे असे विचारले. हे सर्व पाहून समर्थ त्या विहीरीजवळ आले. आत डोकावून ते म्हणाले, ''अंबाजी, कल्याण आहे ना ?'' आतून उत्तर आले, ''स्वामी, आपल्या कृपेने सर्व कल्याण आहे.'' समर्थांची आज्ञा घेऊन अंबाजी वर आले ते 'कल्याण' होऊनच. त्यांनाच पुढे सर्व कल्याण स्वामी म्हणू लागले. धर्म कार्यासाठी स्वतःच्या शरीराचीही पर्वा न करणारे कल्याण स्वामी सर्व शिष्यांचे आदर्श आहेत.

कविवर्य मोरोपंत म्हणतात :

**निजवचने वटशाखा तोडुनि जो शिष्य पावला पतन ।**

**तो कल्याण चि केला जीवनदाने करुनिया जतन ।।**

# समर्थ रामदास स्वामी आणि श्री कल्याण स्वामी

इ. स. १६४८ ते इ. स. १६७८ पर्यंत कल्याण स्वामी हे रामदास स्वामीं बरोबर सावली प्रमाणे होते.

श्री आत्माराम स्वामी म्हणतात :

**आरंभापासोन शेवटवरी । सद्गुरुचर्या जे नानापरी ।**
**नाना अनुवादु उपासना सारी । कल्याण महाराजा ठाऊक ।।**

या काळात घडलेले कांही प्रसंग अत्यंत प्रेरणादायक आहेत.

**समर्थ कल्याणांना टाळ फेकून मारतात** : संभाजीनगर (औरंगाबाद) येथे समर्थांची कीर्तने चालू होती. कल्याण स्वामी समर्थांना कीर्तनामध्ये साथ करत असत. समर्थांच्या केवळ संकेतानेच कल्याण स्वामी अभंग म्हणत असत. यावेळी मात्र त्यांना अभंग आठवला नाही. हे पाहून समर्थांनी आपल्या हातातील टाळ कल्याण स्वामींना फेकून मारला. तो त्यांच्या डोक्याला लागला. डोक्यातून रक्ताची धार वाहू लागली. त्यानंतर त्यांना अभंग आठवला. नंतर मात्र समर्थांनी ती जखम स्वहस्ते बांधली. यावर समर्थ म्हणत,

**'आम्ही रांधतो ते सेवूनी, अवशिष्ट देतो मज काढूनी ।।'**

याचा अर्थ असा की समर्थांनी केलेल्या काव्यातील आवश्यक तो भाग कल्याण स्वामी त्या त्या वेळी सांगत असत.



**कल्याणा, छाटी उडाली** : सज्जनगडावर असताना एकदा जोराचा वारा सुटला. त्यामुळे समर्थांच्या अंगावरील वस्त्र (छाटी) वाऱ्याने उडाले. समर्थ उद्गारले, ''कल्याणा, छाटी उडाली.'' त्यांचे हे वचन ऐकताच कल्याण स्वामींनी त्या कड्यावरुन तात्काळ उडी टाकली आणि समर्थांचे वस्त्र हवेतच झेलले. सज्जनगडावर आजही ही जागा 'कल्याण छाटी स्मारक' म्हणून दाखवतात. आपल्या सद्गुरुचे वस्त्र मलिन होवू नये म्हणून केलेले हे साहस होते.



**खांडूकाची गोष्ट** : असेच एकदा समर्थ वेदनांनी कण्हत होते. त्यांची ती अवस्था पाहून शिष्यांनी त्यांना काय झाले म्हणून विचारले असता समर्थांनी पायाला झालेल्या खांडूकाकडे बोट दाखवले. त्यामुळे तीव्र वेदना होत असल्याचे सांगितले आणि उपाय विचारल्यावर तोंडाने चोखून ते मोकळे करण्याचा इलाज सांगितला. हे काम करण्यास कोणीही शिष्य तयार होत नाही हे कळताच कल्याण स्वामी पुढे आले. आपल्या गुरुंचे कष्ट दूर करण्यासाठी त्यांनी समर्थांचा पाय हातात घेतला आणि त्या खांडूकावरील पट्टी सोडून त्याला तोंड लावले. त्यातून अत्यंत मधुर आंबा निघाला.

शिष्यांची परीक्षा घेण्यासाठी समर्थ रामदास स्वामी अनेक लीला करत असत. श्री कल्याण स्वामींची गुरुभक्ती पाहून सर्वजण अवाक् झाले.



**ब्रह्मपिशाच्च** : समर्थांनी कल्याण स्वामींना लेखनाच्या निमित्ताने चाफळला पाठवून दिले आणि स्वतः सज्जनगडावर ब्रह्मपिशाच्चाचे सोंग घेतले. जटा सोडल्या. कपाळावर शेंदराचा मळवट भरला व हातामध्ये शस्त्र घेऊन रौद्ररुप धारण केले. विदेहीपणे मुक्ती भोगणाऱ्या समर्थांनी अन्नपाणी ही ग्रहण करणे सोडून दिले. सज्जनगडावरील शिष्य भयभीत झाले. भोजनभाऊ चिंताग्रस्त झाले. त्यांनी कल्याण स्वामींना बोलावून घेतले. सर्व प्रसंग जाणून घेतल्यावर कल्याण स्वामींनी स्वहस्ते स्वयंपाक करुन तो समर्थांकडे घेऊन निघाले. त्यांना नमस्कार करुन कल्याण स्वामींनी अन्न ग्रहण करण्याची विनंती केली. समर्थ म्हणाले, ''कल्याणा, परत जा. जवळ येवू नकोस.'' परंतु तरीही कल्याण स्वामी पुढे गेले व ताट समोर धरले. समर्थ गरजले, ''कल्याणा, परत जा अन्यथा प्राण संकटात पडतील.'' तरीही दृढनिश्चयी कल्याण स्वामी जागचे हालले नाहीत.

मग मात्र समर्थ कल्याण स्वामींवर धावून गेले व त्यांनी हातातील शस्त्र उगारले. कल्याण स्वामींनी मान झुकवली व म्हणाले, ''गुरुसेवा करताना गुरुंच्या हस्ते आलेला मृत्यु हाच मोक्ष.'' कल्याण स्वामींची ही गुरुनिष्ठा पाहून समर्थांनी हातातील शस्त्र टाकून दिले व त्यांना अलिंगन दिले आणि अन्नग्रहण केले. आजही सज्जनगडावर हे स्थान दाखवले जाते.



**विड्याची पाने :** एकदा समर्थ आपल्या शिष्य परिवारासह रामच्या घळीमध्ये होते. अगदी मध्यरात्री समर्थांनी पान खाण्याची इच्छा व्यक्त केली. परंतु विड्याची पाने तेव्हा तेथे नव्हती. हे कळताच कल्याण स्वामी पाने आणण्यास निघाले. निबिड अरण्य, घनदाट काळोख याची पर्वा न करता पाने आणण्यास गेलेले कल्याण स्वामी बराच वेळ परत न आल्याने स्वतः समर्थ त्यांच्या शोधात निघाले. बऱ्याच अंतरावर कल्याण स्वामी निपचित पडले होते. त्यांना एका विषारी सापाने दंश केला होता. त्यानंतर समर्थांनी ते विष उतरवले व सर्वजण परत घळीमध्ये आले.

**समर्थांच्या वस्त्रांना नमस्कार :** नेहमीप्रमाणे कल्याण स्वामी नदीवर वस्त्र धुण्यासाठी घेऊन गेले. त्यांनी स्वतःचे व समर्थांचे वस्त्र वेगळ्या ठिकाणी ठेवले. आधी समर्थांचे वस्त्र धुतले आणि त्याला नमस्कार केला. नदीवर आलेले इतर लोक हा प्रकार पहात होते. त्यांनी कल्याण स्वामींना विचारले, ''आपण या वस्त्रांना का नमस्कार करत आहात ? ही कोणाची वस्त्रे आहेत ?'' त्यांना उत्तर देताना कल्याण स्वामी म्हणाले, ''ही वस्त्रे माझे गुरु श्री समर्थ रामदास स्वामींची आहेत. म्हणून ती वस्त्रे मला पूज्य आहेत.'' कल्याण स्वामींचे हे बोलणे ऐकून त्या लोकांनी समर्थांचे दर्शन घेण्याची इच्छा व्यक्त केली. श्री कल्याण स्वामी त्यांना आपल्या बरोबर समर्थ दर्शनासाठी घेऊन गेले.

समर्थ रामदास स्वामी आणि कल्याण स्वामी ही गुरु शिष्यांची जोडी पाहून त्यांनी दोघांनाही नमस्कार केला.

**कल्याण चोरांना पिटाळतात :** एकदा रात्री कल्याण स्वामी समर्थांचे पाय चेपत बसले होते. त्यावेळी कांही चोर सज्जनगडावर आले. तेव्हा समर्थांची आज्ञा घेऊन त्यांनी सर्व चोरांशी एकट्याने सामना केला व सर्व चोरांना पिटाळून लावले.



**हत्ती नियंत्रणात आणला :** एका यात्रेमध्ये समर्थ व कल्याण स्वामी गेले होते. तेथे असलेला एक हत्ती उधळला. लोक घाबरले. पुन्हा एकदा कल्याण स्वामींनी आपल्या अफाट शारीरिक क्षमतेचा प्रत्यय दिला. त्यांनी त्या उधळलेल्या हत्तीला नियंत्रणात आणले. अनेक लोकांचे जीव वाचविले. धर्माच्या कामासाठी त्यांनी आपल्या शक्तीचा सदुपयोग केला.



कल्याण स्वामी महापूर आलेल्या नदीमध्ये अनेकदा उडी टाकत व सुखरुप पैलतीरावर जात. बरेचदा ते समर्थांना देखील खांद्यावर बसवून नदी पार करत. म्हणूनच समर्थ सांप्रदायिक साहित्यामध्ये उल्लेख आहे -

**''रामचंद्रा जैसा मारुती । तैसा दासा कल्याण ।।''**

**कल्याण स्वामी रत्न काढून ठेवतात** : एकदा समर्थांनी कल्याण स्वामींना कांही रत्ने परिधान करण्यासाठी दिली. ती रत्ने घेतानाच कल्याण स्वामींचा चेहरा उदास बनला. श्री समर्थांनी याचे कारण विचारल्यावर कल्याण स्वामी म्हणाले, ''एकदा श्रीराममय अलंकार धारण केल्यावर या पाषाणांचा काय उपयोग ? उलट या रत्नांमुळे आपल्या सेवेत अंतरच पडेल. या पाषाणांमुळे कोणी सुखी झाले आहे काय ?'' त्यांचे हे बोल ऐकून समर्थ समाधान पावले व त्यांना ते रत्ने काढण्याची परवानगी दिली.

एका भक्ताने कल्याण स्वामींना सोन्याची दोन कडी दिली. ते दोन्ही कडे कल्याण स्वामींनी कोठी घरात टाकून दिली. हातामध्ये घातली नाहीत. त्यांच्या या विरक्तीमुळेच समर्थ म्हणाले,

**यासी गुरुत्व होईल लभ्य । अचूक घडला की परमार्थलाभ ।**

**इंद्रही उपचारु पावला स्वयंभ । दृष्टीस न आणि हा निस्पृही ।।**

**दाळगप्पू** : सद्गुरुंच्या सेवेसाठी सर्व जीवन अर्पण करणारे कल्याण स्वामी सर्वांनाच आदर्श आहेत. समर्थांना सज्जनगडावरील साठविलेले तळ्याचे पाणी आरोग्याला मानवत नसे. म्हणून दररोज कल्याण स्वामी सज्जनगड उतरुन खाली वाहणाऱ्या उरमोडी नदीतून पाणी घेऊन येत असत. हे पाणी आणण्यासाठी दोन हंडे असत. ते प्रचंड हंडे आजही सज्जनगडावर आहेत.

दिवसभर अशी शारीरिक कष्ट करणाऱ्या कल्याण स्वामींचा आहारही त्याला साजेसा होता. समर्थांनी त्यांना अर्धा शेर तूप, दोन शेर डाळ व एक शेर गूळ खाण्यास सांगितले. त्यांचा हा दिनक्रम बघून अनेक पढीक आणि शब्दज्ञानी शिष्य त्यांना 'दाळगप्पू' असे म्हणत.

कोणाला आपल्या पांडित्याचा, कोणाला आपण केलेल्या दासबोध पारायणांचा

अभिमान होता. कल्याण मात्र कांहीही न करता केवळ पाणी वाहणे, लेखन करणे असली कामे करुनही समर्थांना प्रिय कसा ? अशी त्यांची चर्चा चालू असे. या सर्वांबरोबर एकदा चर्चा चालू असता समर्थांनी वेदान्त विषयाची सुरुवात केली. मी मी म्हणणारे अनेक शब्दज्ञानी त्या प्रत्ययाच्या ब्रह्मज्ञानाने शांत झाले. मग समर्थांनी कल्याणास बोलावले. एका श्लोकाच्या पहिल्या दोन चरणांचा उच्चार केला. त्याचे पुढचे दोन चरण कल्याण स्वामींनी पूर्ण केले. 'गुरु शिष्यांचा संवाद' बराच वेळ चालू होता. समर्थ श्लोकाचा पूर्वार्ध सांगत व कल्याण स्वामी पुढचा उत्तरार्ध पूर्ण करत. असे अनेक श्लोक झाले. हीच 'दासगीता' होय. वेदान्त विषयातील तत्त्वांचे यामध्ये विवरण आहे. आत्माराम स्वामी म्हणतात,

**कल्याणदाता तो चातुर्यनिधी । निष्ठा जयाची श्रीगुरुपदी ।।**

कल्याण स्वामींची विद्वत्ता व अधिकार पाहून सर्वजण दिङ्मूढ झाले. अशाच प्रकारचा प्रसंग 'दासबोधा' संदर्भात झाल्याचे उल्लेख आहेत. कांही शिष्य दासबोधाच्या पारायणांची चर्चा करीत होते. त्यामध्ये ''कल्याणाची पारायणे होत नाहीत, नुसताच पाणी वाहतो.'' असे बोलणे झाले. तेव्हा समर्थांनी सर्वांना कांही प्रश्न विचारले, पाठांतर विचारले. त्यावेळी सर्वजण शांत झाले. पाणी वाहणाऱ्या कल्याण स्वामींना समर्थांनी एका ओवीचा पहिला चरण सांगितला. तो असा - ऐसा सद्‌गुरु पूर्णपणी ।....... कल्याण स्वामींनी पुढची ओवी पूर्ण केली.

**ऐसा सद्‌गुरु पूर्णपणी । फिटे भेदाची कडसणी ।**

**देहेविण लोटांगणी । तया प्रभूसी ।।**

श्री कल्याण स्वामींनी दासबोध धारण केला होता. कल्याण स्वामी दासबोध जगत होते. 'आधी केले मग सांगितले' असा समर्थांचा दंडक होता. त्यांनी ज्यांना ज्ञान सांगितले ते कल्याण स्वामी म्हणजे जिवंत दासबोधच होते.

श्री आत्माराम स्वामी म्हणतात -

**कल्याण स्वामीची स्थीती ऐसी ।**

**न सोडिती साधकधर्मासी ।**

**गुरुस्तौत्य करिती अहर्णिसी ।**

**करिती शिष्यासी आपणासम ।।**



# समर्थांचे 'लेखकू'

कल्याण स्वामी ओळखले जातात ते समर्थ रामदास स्वामींचे 'लेखनिक' म्हणून. दासबोधासह बहुतेक सर्व समर्थ साहित्य हे कल्याण स्वामींच्या हातचे उपलब्ध आहे. समर्थांचा संचार अनेक ठिकाणी असे. कल्याण स्वामी सर्वत्र त्यांच्याबरोबर असत.



समर्थांच्या मुखातून जे कांही उत्स्फूर्त काव्य होत असे ते कल्याण स्वामी लिहून घेत. इ. स. १६५२ ते इ. स. १६६० या काळामध्ये ग्रंथराज दासबोधाची रचना शिवथरघळीमध्ये झाली. तो समर्थांनी सांगितला आणि कल्याण स्वामींनी लिहून घेतला. चाफळ श्रीराम मंदीराचे निर्माण कार्य चालू असताना समर्थांनी एकाच बैठकीमध्ये २०५ 'मनाचे श्लोक' सांगितले आणि कल्याण स्वामींनी ते लिहून घेतले. कल्याण स्वामी एका रात्रीत दासबोध लिहून काढत. अशा अनेक कथा त्यांच्या लेखनाबद्दल सांगितल्या जातात.

धुळे येथील 'समर्थ वाग्देवता मंदिरामध्ये' असलेले २५० पानांचे 'कल्याणपोथा' नावाचे बाड आजही त्यांच्या लेखन कौशल्याची साक्ष देते. त्यांची झोळी ही एखाद्या गोणी एवढी मोठी असे. त्यामध्ये विविध ग्रंथ, लेखन साहित्य, शाई, बोरुचे टाक इ. गोष्टी असत. त्यांचे हस्ताक्षर अतिशय वळणदार होते. कल्याण स्वामींचे गुरुबंधू अनंत कवी म्हणतात -

**'स्वामींचा कविता समुद्र अवघा कल्याण लिहीतसे ।'**

समर्थांनी कल्याण स्वामींना लेखनिक म्हणूनच निवडले होते. ते न थांबता तासन् तास लिहीत. समर्थांनी उत्स्फूर्तपणे काव्य करावे आणि कल्याण स्वामींनी तत्काळ लिहून घ्यावे असे अनेकदा होत असे. लिहीताना खाडाखोड, विसरणे इ. होत नसे. ते नवीन पाने कधी बनवतात, शाई कधी तयार करतात याचा पत्ता लागत नसे. या सर्वांचे कारण होते त्यांचा योगाभ्यास. योगाभ्यासामुळे त्यांची एकाग्रता प्रचंड होती असे आत्माराम स्वामी म्हणतात.

समर्थ प्रतापकार श्री गिरीधर स्वामी लिहितात -

**कल्याण नामा ग्रंथ विस्तारी । उत्कट कीर्ति विश्वाभितरी ।**
**देहांत साधने गुरुआज्ञे करी । कल्याण चराचरी पावला नाम ।।**

# जगदोद्धारासाठी जा हो .....

एक दिवस समर्थ कल्याण स्वामींना म्हणाले,

**द्यावया न दिसती कांही पदार्थ ।**

**तुजकडे आता वोपिले गुरुत्व ।**

**तुझ्या हृदयांतरी राहणे मात ।**

**जाई महंती करावाया ।।**

शिष्य पूर्णपणे तयार झाला की त्याच्यामध्ये गुरुत्त्व येते. मग त्याचे सद्‌गुरु त्याला जगाच्या कल्याणार्थ इतरत्र पाठवतात. आणि हीच ती गुरु - शिष्य परंपरा.

आपला प्रिय शिष्य कल्याण सर्व प्रकारच्या परीक्षांमध्ये तावून सुलाखून निघाला आहे. त्याने अनेक वर्षांची कठोर साधना केली आहे. आता या परिपूर्ण शिष्याने इतरांनाही आपणासारखे करावे अशा इच्छेने समर्थांनी श्री कल्याण स्वामींना जगदोद्धार करण्यासाठी परांडा, डोमगाव या भागामध्ये जाण्याची आज्ञा केली. परंपरेने अशी कथा सांगतात की, कांही वर्षे आधी या भागामध्ये समर्थ व कल्याण स्वामी आले असता, समर्थांनी कल्याण स्वामींना संकेताने ही जागा दाखवून ठेवली होती.

इ. स. १६७८ मध्ये कल्याण स्वामी सज्जनगडावरुन निघाले. इतके वर्षे ज्यांचा सहवास मिळाला ते सद्‌गुरु समर्थ रामदास स्वामी यांचा वियोग होणार म्हणून ते कळवळले. परंतु गुरुइच्छा हीच गुरुआज्ञा समजून समर्थांना साष्टांग दंडवत घालून, आपली जवळ ३०-३२ वर्षांची समर्थ सेवा त्यांच्या चरणी अर्पण करुन कल्याण स्वामी डोमगावकडे मार्गस्थ झाले. दासविश्रामधामामध्ये असा उल्लेख आहे की, सज्जनगड सोडताना कल्याण स्वामींची दृष्टी अधू झाली होती.



# डोमगांवच्या मार्गावर

डोमगांवकडे जाण्यापूर्वी कल्याण स्वामी शिरगांवला गेले. तेथे बंधू दत्तात्रय स्वामी यांची भेट घेऊन ते पुढे निघाले. बरोबर कांही शिष्य परिवार होता.



पंढरपूरच्या वाटेवर असताना निबिड अरण्यामध्ये एका 'हणमंत' नावाच्या दरोडेखोराने त्यांना अडविले. सर्व लोक भीतीने थरथर कापू लागले. तेव्हा कल्याण स्वामींनी त्यांना धीर दिला. ''आपले सद्‌गुरु समर्थ आहेत. त्यामुळे आपल्याला भय नाही.'' असे म्हणून त्यांनी एक धीरगंभीर दृष्टीक्षेप त्या दरोडेखोरावर टाकला. तो पाहताच दरोडेखोर त्यांच्या चरणांवर कोसळला आणि क्षमा याचना करु लागला. कल्याण स्वामींनी त्याला उठविले आणि हा दरोडेखोरीचा मार्ग सोडण्यास सांगितले. ते म्हणाले, ''तुझ्या कुटुंबाच्या पोषणासाठी जर तुला कांही हवे असेल तर आमच्याकडील सर्व कांही घेऊन जा.'' ह्या महात्म्याचे हे बोल ऐकून हणमंत दरोडेखोराच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या.

हणमंताने कल्याण स्वामींची क्षमा मागितली. त्यांचे पूजन केले. आपण स्वतः जंगलाच्या बाहेर पर्यंत सोडण्यास आला. आत्माराम स्वामी म्हणतात,

**स्थितीवंत ऐसा हो कल्याण स्वामी ।**

**निष्ठा जयाची गुरुपादपद्मी ।।**

पुढे कल्याण स्वामी पंढरपूरला आले. पूर्वी समर्थांबरोबर पंढरपूर येथे आल्यावर दर्शन घेतलेल्या सर्व ठिकाणी ते पुन्हा गेले. तेथील दर्शन घेतले.

चंद्रभागेच्या वाळवंटामध्ये कल्याण स्वामींचे कीर्तन झाले. ते कीर्तन ऐकून सर्वांना समर्थांच्या कीर्तनाची आठवण झाली. श्री पांडुरंगाचे दर्शन घेऊन कल्याण स्वामी तुळजापूरला आले. तेथे श्री तुळजाभवानीचे दर्शन घेतले. असेच भ्रमण करत ते परंडा परिसरात आले.



# श्रमहरणीतटाकी स्वामी कल्याण राजा

डोमगावला आल्यावर कल्याण स्वामींना अनेक शिष्य मिळाले. श्रमहरणी सीना नदीच्या तीरावर, डोमगाव या गावी मठ स्थापना करुन समर्थांना अपेक्षित असे धर्मस्थापनेचे कार्य पुढे चालू ठेवण्याचे त्यांनी ठरवले.

मराठवाड्यातील धाराशिव चहुबाजुंनी परकीय आक्रमकांनी वेढलेला. अशा ठिकाणी प्रभू श्री रामचंद्रांची, मारुतीरायाची उपासना होण्याची नितांत गरज होती. इ. स. १६७८ ते. इ. स. १७१४ या कालावधीमध्ये योगिराज श्री कल्याण स्वामींनी मराठवाडा, आंध्र प्रदेश, कर्नाटकच्या सीमा भागामध्ये अडीचशेहून अधिक मठांची स्थापना केली. जागोजागी कीर्तने, दासबोधाचा प्रसार इत्यादिद्वारे सामान्य जनतेला उपासनामार्गाला लावले.

याच कालावधीत एकदा बालाघाट परिसरात फिरत असताना एका तळ्याकाठी स्नानसंध्या करुन कल्याण स्वामी जप करत बसले. इतर सर्व शिष्य देखील रामनामाचा अखंड जप करु लागले. यावेळी एक भोंदू संन्यासी आला व थेट कल्याण स्वामींच्या मांडीवर पाय देऊन उभा राहिला. त्याचे हे कृत्य बघून कल्याण स्वामींचे शिष्य त्या भोंदू संन्याशाचा समाचार घेण्यासाठी उठले. त्यावेळी अत्यंत शांतपणे कल्याण स्वामी त्यांना म्हणाले, ''आपल्या सांप्रदायाला बट्टा लागेल असे कोणतेही कृत्य करु नका. समर्थ कृपेने माझे शरीर अत्यंत बळकट आहे. ज्याप्रमाणे झाडावर एखादा पक्षी बसला असता झाडाला त्याचे कष्ट होत नाहीत, त्याचप्रमाणे ह्या संन्याशाच्या माझ्या शरीरावर उभारण्याने मला कोणताही त्रास होत नाही.'' कल्याण स्वामींचे हे शब्द ऐकून तो दुराचारी वरमला. समर्थांच्या या सत्शिष्याची शांती पाहून त्याने कल्याण स्वामींची क्षमा मागितली. श्री कल्याण स्वामींनीही त्याला अनुग्रह दिला. तो संन्यासी कल्याण स्वामींचा एकनिष्ठ शिष्य झाला. आत्माराम स्वामी म्हणतात,

**धन्य सत्शिष्य कल्याणराय ।**
**कांहीच मानसी न बाधी संशय ।**
**गुरुदास्यविषई धुरीण होय ।**
**तरीच रघुवर साह्य असे ।।**

'अंबेरीवाले' नावाचे कल्याण स्वामींचे एक शिष्य होते. त्यांची अशी इच्छा होती की, कल्याण स्वामींनी रामनवमीचा उत्सव त्यांच्या गावी करावा. आपल्या शिष्याच्या विनंतीला मान देऊन कल्याण स्वामी 'अंबेरी' ला गेले. उत्सव सुरु झाला. अतिशय भव्यदिव्य रामजन्मोत्सव झाला. दुपारी भोजनाच्या पंगती बसल्या. तेंव्हा कांहीतरी कुरापत काढण्याच्या हेतूने एक संन्यासी वाद करु लागला. ते पाहून यजमान घाबरले. तो संन्यासी म्हणत होता की, ''मी संन्यासी असताना तुम्ही या कल्याण गोसाव्यांना कसे काय मान देता?'' त्याचा हा आक्षेप ऐकून स्वतः कल्याण स्वामी तेथे गेले व त्या संन्याशाचा यथोचित सन्मान केला. तरी देखील संन्यासी शांत होत नव्हता व संपूर्ण पंगत उधळण्याच्या आवेशामध्ये आला. हे पाहून कल्याण स्वामींच्या शिष्यांनी त्यांना चौदावे रत्न दाखविले. संन्यासी पळून गेला. श्रीराम जन्मोत्सव अतिशय उत्साहात पार पडला.

**''लौंदास लौंद लावोनी द्यावा । टोणप्यास आणावा टोणपा ।।''**

या समर्थ वचनाचा सर्वांना अनुभव आला.

एकदा कल्याण स्वामींनी एका शिष्याला जवळच ठेवलेली एक वस्तु मागितली. आपल्या गुरुंची दृष्टी अधू आहे हे पाहून तो म्हणाला, ''स्वामी , ही वस्तु येथे नाही.'' त्याचा हा खोटेपणा ओळखून कल्याण स्वामी कडाडले, ''अरे ! मला जरी नीट दिसत नसले तरी केवळ एखाद्या गोष्टीच्या अस्तित्वाने मला त्याची जाणीव होते. हा ज्ञानसाठा मला समर्थ कृपेने मिळाला आहे. गुरुशी असत्य बोलणाऱ्या शिष्याला क्षमा नाही. जा. चालता हो.'' कल्याण स्वामींचे रौद्ररुप पाहून तो शिष्य डोमगावहून निघाला व शेवटी इंदूरबोधनला पोहोचला.

आपण केलेल्या कृत्याची लाज वाटून त्याने प्रखर तप केले. इकडे कल्याण स्वामींचेही हृदय द्रवले. कांही दिवसांनी तो शिष्य परत डोमगावला आला. त्यावेळी कल्याण स्वामी त्याची वाट पहात होते. शिष्याला त्याची चूक कळली होती. तो कल्याण स्वामींच्या पाया पडला. स्वामींनी त्याला क्षमा केली. सत्य बोलण्याचे महत्त्व शिष्याच्या मनावर बिंबले होते. नंतर दोघेही एकाच पंगतीत भोजनाला बसले. शिष्यांकडून छोटीशीही चूक होवू नये म्हणून अशा अनेक लीला कल्याण स्वामी करत असत.

आत्माराम स्वामी म्हणतात -

**ऐसा कल्याणस्वामी प्रेमळ ।**

**शिष्यसमुदाई राजा केवळ ।।**



# मज तो आवडतो मम स्वामी

कल्याण स्वामी जरी डोमगांव प्रांतामध्ये असले तरी त्यांचे चित्त समर्थ चरणांकडेच होते. ते त्यांच्या शिष्यांना नेहमीच समर्थ चरित्र सांगत. त्यावेळी त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागत. ते सर्व शिष्यमंडळींना म्हणत, ''श्री समर्थांचे चरित्र अगाध आहे. त्याचा थांग लागत नाही. आता त्यांचे काव्य कोण लिहून घेत असेल ? त्यांच्या बरोबर निबिड वनात कोण फिरत असेल ? समर्थ अत्यंत उदासीन वृत्तीचे आहेत. त्यांना वेळच्या वेळी भोजन कोण देत असेल ?'' असे बोलताना कल्याण स्वामींचा कंठ दाटून येत असे. श्री समर्थ रामदास स्वामी आणि श्री कल्याण स्वामी यांच्यातील प्रेमभाव पाहून सर्व लोक धन्य होत. आत्माराम स्वामी म्हणतात -

**कल्याणस्वामी परम उदार । भोवते मिळता शिष्यजन चतुर ।**

**समर्थांचे सांगती चरित्र । ते सीकती गाती किर्तनी ।।**

एकदा रस्त्यातून चालता चालता गावातील लोक कल्याण स्वामींच्या पाया पडू लागले. त्यावेळी त्यांच्या हातामध्ये वीणा होता. तात्काळ कल्याण स्वामींनी तो वीणा दुसरीकडे ठेवण्यास सांगितला. ते म्हणाले, ''हा वीणा पाहून लोक मला 'हरिदास' म्हणत आहेत, मला तर 'रामदासी' हेच नाव प्रिय आहे. 'रामदासी' हे नाव मिळवणे फार मोठे सुकृत आहे.'' असा अनन्य भाव पाहून सर्व शिष्य विस्मीत झाले.

श्री कल्याण स्वामींनी समर्थांवर केलेले हे पद अतिशय सुंदर आहे.

**मज तो आवडतो मम स्वामी । निशिदिनी अंतर्यामी ।।धृ।।**

**अक्षैपदाचा सुखदाता । निरसोनी माया ममता ।।१।।**

**भक्तीमार्गाचा गजढाला । चालविल्या आढाला ।।२।।**

**काय बोलो मी किर्तीसी । न दिसे तुळणेसी ।।३।।**

**छेत्र बहुतांचे दासाचे । धाम ची कल्याणाचे ।।४।।**



# श्री समर्थांचे महानिर्वाण

माघ वद्य नवमी शके १६०३ रोजी समर्थ रामदास स्वामी यांनी सज्जनगड येथे अवतार समाप्ती केली. त्यावेळी त्यांचे लाडके शिष्य कल्याण स्वामी सज्जनगडावर नव्हते.



आपल्या सद्‌गुरुंनी नश्वर देहाचा त्याग केला. त्यांचे दर्शन आपल्याला लाभले नाही हे कळताच कल्याण स्वामींना दुःख अनावर झाले. समर्थ दर्शनाच्या ओढीने ते सज्जनगडावर आले. श्री समर्थांच्या समाधीला अश्रूंचा अभिषेक घातला. आपला प्रिय शिष्योत्तम कल्याण आपल्या दर्शनासाठी आला आहे हे पाहून समर्थांनी कल्याण स्वामींना सगुण दर्शन दिले. समाधी दुभंगली. समर्थांचे ज्योतीर्मय सगुण दर्शन घेऊन कल्याण स्वामी सज्जनगडावरुन खाली आले. त्यांना समर्थांनी सांगितले की, ''मी देह रुपाने जरी नसलो तरी दासबोध, आत्माराम हे ग्रंथ माझीच रुपे आहेत. त्यामुळे दुःखी होवू नये. मी निरंतर आहे.''

समर्थांचा हा गुरुपदेश घेऊन कल्याण स्वामी गड उतरले. परंतु त्यानंतर मात्र ते परत कधीही सज्जनगडावर गेले नाहीत. सज्जनगडावर सर्वत्र समर्थांच्या वास्तव्याच्या खुणा आहेत. त्यामुळे त्यांना सर्व सज्जनगडच समर्थरुप वाटू लागला. प्रतिवर्षी ते सज्जनगडाच्या पायथ्याशी जात व तेथूनच श्री समर्थांना नमस्कार करत असत. धन्य ही गुरुभक्ती.

श्री आत्माराम स्वामी म्हणतात -

**कल्याण स्वामी सत्सिष्य मोठा ।**
**सद्‌गुरुपायी जडलीसे निष्ठा ।**
**हृदयी जालासे परमार्थ साठा ।**
**सदा संतुष्टांमाजी वसतु ।।**



# श्री कल्याण स्वामींचे व्यक्तिमत्त्व

कल्याण स्वामींची शरीरयष्टी अत्यंत बलदंड होती. ते रोज १२०० सूर्यनमस्कार घालत. पूर आलेल्या नदीमध्ये उडी मारत व सहजपणे दुसऱ्या किनाऱ्यावर येत. दाढी व जटा वाढलेल्या असून जटा रुद्राक्षांनी बांधत असत. अंगाला भस्म लावलेले असे. दोन्ही कानांमध्ये कुंडले, हाताच्या बोटांमध्ये मुद्रिका असत. दंडावर मारुती असे. जानवे ही घालत. त्यांचे वस्त्र म्हणजे कौपिन. ही कौपिन 'हुरमुजी' (भगव्या) रंगाची असे. मुखामध्ये अखंड रामनाम आणि अतिशय शांत स्वभाव होता.

कल्याण स्वामींकडे अतिशय मोठा ग्रंथ संग्रह होता. कोणी मागितल्यास कल्याण स्वामी तो ग्रंथ देऊन टाकत. कल्याण स्वामींनी काढलेले 'वीर मारुती' चे एक चित्र उपलब्ध आहे. यावरुन लक्षात येते की ते चित्र देखील काढत. त्यांचे अक्षर अत्यंत रेखीव व वळणदार होते. एका दिवसात ते शेकडो ओव्या लिहून काढत. त्यांच्या खांद्यावर झोळी असे. तिचा आकार जवळ जवळ एखाद्या पोत्याएवढा होता. त्यांच्या हातामध्ये जपमाळ असे.

परंपरेने श्री कल्याण स्वामींना 'योगिराज' ही उपाधी लावण्यात येते. समर्थ कृपेने कल्याण स्वामींचा 'योगमार्गामध्ये' मोठा अधिकार होता. त्यांचे उपलब्ध असलेले रेखाचित्रही ते योगमुद्रेमध्ये बसलेल्या अवस्थेमध्ये आहे. कल्याण स्वामींची कीर्तने ऐकताना भक्तजनांना समर्थांची आठवण होत असे. चाफळ येथील रामनवमी उत्सवामध्ये दशमीचे लळीताचे कीर्तन कल्याण स्वामी करत असत.

श्री कल्याण स्वामींच्या स्वभावाबद्दल कांही उल्लेख 'श्री दासविश्रामधाम' मध्ये येतात. ते अत्यंत हृद्य आहेत. ते सर्व शिष्यांना एकत्र करुन समर्थ चरित्र सांगत. कल्याण स्वामींनी त्यांच्या शिष्यांना विविध कलांमध्ये पारंगत केले. कोणी शिष्य कीर्तन करताना चुकला तर ते त्याला रागवत नसत. एखादा रामभक्त अत्यंत दरिद्री वा दुर्बळ असेल तरी देखील ते त्याला रामासम मानत असत. एखाद्या सामान्य कवीने कांही काव्य केले असता ते त्याचा सन्मान करत.

समकालीन काव्यामध्ये कल्याण स्वामींचा उल्लेख 'भरताचा अवतार' म्हणून केला आहे.

एखाद्या ब्रह्मनिष्ठ महात्म्याचे व्यक्तीदर्शन करणे हे शब्दांच्या सहाय्याने शक्य नाही. आपण खालील रचना वाचू.

**सीनेच्या तटाकी महापुण्यभूमी । समाधी विराजे तये डोंबग्रामी ।**
**बहू रम्य शोभा दिसे गोपुराची । जगी धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ।।१।।**
**गुरुभक्त वीरक्त जो ब्रह्मच्यारी । महा तीव्र वैराग्य ते निर्विकारी ।**
**क्षमा शांती अद्भूत त्या निस्पृहाची । जगी धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ।।२।।**
**जगी बद्ध अज्ञान ते सिद्ध केले । बहू संत ते महंत होऊनी ठेले ।**
**कृपा आगळी सौम्य लीळा जयाची । जगी धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ।।३।।**
**प्रतापे बळे आगळा योगिराणा । नसे ते सीमा वर्णिता पूर्ण ज्ञाना ।**
**पदी लागता मुक्ती लाभे फुकाची । जगी धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ।।४।।**
**मही मंडळी राम उपासना हो । बहू नेटकी शुद्ध दिक्षा जना हो ।**
**प्रिती लावली भक्ति त्या राघवाची । जगी धन्य ते कीर्ति कल्याण ज्याची ।।५।।**



# श्री कल्याण स्वामींचा शिष्य परिवार

डोमगाव, परंडा या भागामध्ये आल्यावर कल्याण स्वामींनी जागोजागी मठस्थापना केली. त्यांची निस्पृहता, विरक्ती, प्रत्ययाचे ब्रह्मज्ञान, उपासना इत्यादिमुळे अनेकांनी त्यांचे शिष्यत्व स्वीकारले. त्यामध्ये मुख्यतः जगन्नाथ तथा जगज्जीवन स्वामी (तडवळे मठ), रामाजी दादा (बारामती मठ), हरिबाबा भूमकर, शिवराम स्वामी (आपचंद मठ) हे प्रमुख होत. या सर्व शिष्यमंडळींनी कल्याण स्वामींवर विपुल काव्य केले आहे. ह्या सर्व शिष्य प्रशिष्यांकडून जवळ जवळ २५० हून अधिक मठांची स्थापना मराठवाडा, आंध्र, कर्नाटक सीमा भाग या प्रदेशांमध्ये झाली.

शिष्यमंडळींनी रचलेल्या आरत्यांमधून, विविध काव्यांमधून शिष्यांचा उत्कट भाव दिसून येतो. एकूण ५८ शिष्यांची यादी उपलब्ध आहे.

सामराज हे कल्याण स्वामींचे शिष्य होते. त्यांनी कल्याण स्वामींवर अतिशय भावपूर्ण पद लिहिले आहे.

**धन्य तो साधु जाणा । कल्याण योगिराणा ।।धृ।।**

**ज्याच्या चरणाची ऐसी ख्याती । जे शरण जाती ।**

**ते ते साधक सिद्ध होती । हे पावन कीर्ति ।**

**महिमा वर्णू मी किती । श्रुति नेति नेति म्हणती ।।१।।**

**माथा ठेऊनी मोक्षपाणी । गुज सांगोनी कानी ।**

**लावी सस्वरुप निज ध्यानी । निज दाऊनी नयनी ।**

**सामराज कल्याणदानी । भक्तासी जो निदानी ।।२।।**



# श्री कल्याण स्वामींचे काव्य

कल्याण स्वामींनी समर्थ साहित्याचे लेखन केले. तसेच कांही स्वतंत्र रचना पण केल्या. त्यामध्ये महावाक्य पंचीकरण, सोलीव सुख, ध्रुवाख्यान, शुक आख्यान, चौचरणी ओव्या, आरत्या, पदे इत्यादिंचा समावेश होतो.

'महावाक्य पंचीकरण' हे प्रकरण ७०० ओव्यांचे असून त्यामध्ये ब्रह्म-माया, जीव-जगत् या वेदान्त विषयक संकल्पनांविषयी लेखन आहे. श्री कल्याण स्वामी लिहीतात-

**अत्यंत गहन अर्थ येथे आहे ।**

'सोलीव सुख' या प्रकरणामध्ये गुरुने शिष्यांवर अनुग्रह केला असता आत्मसाक्षात्कार घडताना विविध अवस्थांचे वर्णन आहे. योगमार्गातील अत्यंत गूढ असा विषय केवळ सामान्यजनांसाठी सांगितला असे कल्याण स्वामी त्याच्या शेवटी लिहितात. आत्माराम स्वामी म्हणतात -

**कल्याणसत्सिष्या समर्थस्वामी । करकमळ ठेऊनि मस्तकधामी ।**

**सृष्टिक्रम दाविले अंतर्यामी । ऐसेचि असे पुढतपुढती ।।**

'रुक्मिणी स्वयंवर' हे हिन्दी भाषिक प्रकरण ही कल्याण स्वामींनी लिहिले आहे.

कल्याण स्वामींनी समर्थ रामदास स्वामींवर अनेक आरत्या, पदे रचली आहेत. समर्थांवरील एका पदामध्ये ''देई चौथी भक्ती रे रामा ।'' असं मागणं मागतात. नवविधा भक्तीमधील 'सद्‌गुरुपादसेवन' ही चौथी भक्ती आहे. त्याचप्रमाणे डोमगाव, परंडा या भागातून वाहणाऱ्या 'सीना' नदीला 'श्रमहरणी' असे नांव देऊन 'श्रमहरणी नदीची' आरती लिहिली आहे. 'ओव्या संतमाळा' ही रचना तर अत्यंत सुंदर आहे. संपूर्ण भारतातील संतांना एकएका अवयवाचे, वस्त्राचे रुपक देऊन रामाच्या सगुण रुपाचे वर्णन केले आहे.

हे सर्व काव्य वाचून त्यातील रसाळपणाचा अनुभव येतो. कल्याण स्वामी हे एक श्रेष्ठ वेदांती, योगी, कवी होते याची खात्री पटते. एकूण ओवी संख्या १४४८ आहे.



# धन्य धन्य हे गुरुशिष्यपण

समर्थांच्या महानिर्वाणानंतर त्यांच्या अस्थी चाफळच्या वृंदावनात ठेवण्यात आल्या. त्यांची व्यवस्था, पूजा अर्चा करण्यासाठी कल्याण स्वामींचे शिष्य केशव स्वामी चाफळ येथेच सेवेसाठी राहिले होते. ते प्रतिवर्षी आपल्या गुरुंच्या दर्शनासाठी डोमगावला येत असत. त्यावेळी समर्थांच्या अस्थी विसर्जनाचा विषय काढला की कल्याण स्वामी आणखी कांही काळ थांबण्यास सांगत.

इ. स. १७१४ हे वर्ष होते. कल्याण स्वामी परंड्यास होते. त्यावर्षी आषाढ मास हा अधिक मास होता. परंड्याच्या मठामध्ये श्री कल्याण स्वामी रामायण सांगत होते. हे रामायण ऐकण्यासाठी अनेक साधुसंत आले होते. ती परमपवित्र रामकथा ऐकून सर्वजण तृप्त झाले. इकडे प्रतिवर्षाप्रमाणे केशव स्वामी आपल्या गुरुंच्या दर्शनासाठी डोमगावला निघाले. परंतु निघताना त्यांनी आपल्या बरोबर चाफळहून समर्थांच्या अस्थी घेतल्या. डोमगाव येथून तसेच पुढे जाऊन काशीस समर्थांच्या अस्थी विसर्जित कराव्यात असे त्यांनी ठरविले होते.

आणि परंड्यास अघटित घडले. आपले समर्थ चाफळहून अंतीम प्रवासास निघाले आहेत हे कळताच योगिराज कल्याण स्वामींनी योगबलाने परंडा येथे देह ठेवला. ते दर्भासनावर बसले. त्रिबंध करुन प्राणायाम केला. या प्राणायामाद्वारेच त्यांनी आपले प्राण पंचत्वात विलीन केले. ती तिथी होती अधिक आषाढ शुद्ध त्रयोदशी शके सोळासे छत्तीस, इ. स. १७१४. समर्थांच्या महानिर्वाणानंतर ३३ वर्षांनी कल्याण स्वामींनी देह ठेवला. तेही समर्थांच्या अस्थी विसर्जनाचा योग साधून. दासविश्रामधाममध्ये उल्लेख येतो -

**''ऐसे कोठे नाही हो वर्तले ।**

**सांगायासी ऐकायासी गोष्टी जाली ।।''**

संपूर्ण शिष्यपरिवार शोकसागरात बुडाला. परंड्याचे शिष्य देशमुख यांनी कल्याण स्वामींचे पार्थिव डोमगाव येथे आणले. तेथेच त्यांच्यावर अंत्यसंस्कार करण्यात आले. इकडे केशव स्वामी परंड्यास पोहोचताच त्यांना कल्याण स्वामींच्या महासमाधीची वार्ता कळाली. कल्याण स्वामींची गुरुनिष्ठा, एकरुपता पाहून त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या. ते डोमगाव येथे आले व अत्यंत दुःखी अंतःकरणाने समर्थ रामदास स्वामी आणि कल्याण

स्वामी यांच्या अस्थी एकत्र घेऊन ते काशीस गेले.

कल्याण स्वामींचे पट्टशिष्य मुद्गल स्वामींनी डोमगाव येथे समाधीशिलेची स्थापना केली. या समाधीशिलेबद्दल परंपरेने अशी कथा सांगतात की, श्री कल्याण स्वामी समाधीस्त झाल्यावर श्री मुद्गल स्वामींना स्वप्नदृष्टांत झाला. श्रमहरणी सीना नदीच्या काठी जेथे गाय असेल तेथे मी समाधीरुपाने आहे. त्यानंतर दुसऱ्या दिवशी श्री मुद्गल स्वामी व इतर शिष्य त्या भागामध्ये गेले असता त्यांना खरोखरच गाय दिसली. तेथे खोदकाम केल्यावर समाधी सापडली. त्यानंतर त्या शिलेची स्थापना अंत्यसंस्काराचे जागी डोमगाव येथे करण्यात आली व तेथे भव्य मंदीर बांधण्यात आले.

श्री आत्माराम स्वामी म्हणतात,

**वाटे इतराला समाधिस्त ।**
**परी प्रत्यक्ष असती नांदत ।**
**पाहता भक्तांनी शुद्धभावार्थे ।**
**प्रगटोन करिती सांभाळ ।।**

गुरुशिष्यांचे हे अद्वैत अद्‌भुत आहे. नश्वर देहाचा त्याग केल्यावर ही गुरुशिष्यांची एकरुपता स्तिमीत करणारी आहे. कल्याण स्वामींनी गुरुभक्तीचा, समर्पित जीवनाचा आदर्श आपणा सर्वांसमोर ठेवला आहे.

दासविश्रामधामकर्ते आत्माराम स्वामी म्हणतात,

**धन्य धन्य हे गुरुशिष्यपण ।**
**धन्य धन्य हे सेवाविधान ।**
**धन्य धन्य अभेद लक्षण ।**
**धन्य धन्य लिळा अगाध ।।**



# डोमगाव येथील समाधी मंदीर

अधिक आषाढ शुद्ध १३ शके १६३६, इ. स. १७१४ रोजी श्री कल्याण स्वामी समाधिस्त झाले. त्यानंतर ५९ वर्षांनी सध्याच्या समाधी मंदीराचे बांधकाम झाले.

श्री कल्याण स्वामींची समाधी वालुकामय पाषाणाची असून त्यावर शिवलिंग, पादुका, भगवद्गीतेतील श्लोक कोरलेले आहेत. अनेक वर्षांच्या अभिषेकामुळे समाधीची झीज झाली असून अक्षरे अस्पष्ट झाली आहेत. गाभाऱ्यामध्ये समाधीच्या वरच्या बाजूस श्रीराम, लक्ष्मण, सीता, मारुती यांच्या मूर्ती आहेत. मंदीर अतिशय भव्य व घडीव दगडांचे बांधलेले आहे. कल्याण स्वामींच्या समाधी समोर त्यांचे पट्टशिष्य मुद्गल स्वामींची समाधी आहे. त्यावर दासमारुतीची स्थापना करण्यात आली आहे.

डोमगाव मठाला रामदासी सांप्रदायात अत्यंत महत्त्व आहे. डोमगाव येथील मठामध्ये श्री कल्याण स्वामींच्या हस्ताक्षरातील श्रीमत् ग्रंथराज दासबोधाची मूळ प्रत आहे. दासबोधाची ही प्रत म्हणजे रामदासी सांप्रदायाचा अनमोल ठेवा आहे. तसेच समर्थांनी कल्याण स्वामींना दिलेला सुवर्णाक्षरी कित्ता, केशव स्वामींच्या हस्ताक्षरातील सोनेरी व चंदेरी शाईतील दासबोधाची प्रत हे देखील येथील वैशिष्ट्ये आहेत. मठामध्ये ४ ठिकाणी विविध शिलालेख कोरलेले आहेत.

कल्याण स्वामी परंपरेमध्ये इ. स. १८४० चे सुमारास श्री सखाराम महाराज नामक एक थोर सत्पुरुष होवून गेले. त्यांनी 'अभंग रामगीता' त्याप्रमाणे 'पंचीकरण' इ. ग्रंथ लिहिले. 'संकेत कुबडी' या ग्रंथाचे लेखक संत श्री हंसराज स्वामी हे सखाराम महाराजांचे अंतरंग स्नेही होते. सखाराम महाराजांची समाधी भोईगुडा, हैद्राबाद येथे आहे.

कल्याण स्वामींनी परंडा येथे देह ठेवला ती जागा आजही दाखवण्यात येते. तेथे राम मंदीर व वृंदावन आहे. तेथे असलेल्या भुयारामध्ये कल्याण स्वामी साधना करत असत. या मंदीराची व्यवस्था श्री. वैद्य घराण्याकडे आहे. कल्याण स्वामी वर्षातील कांही काळ डोणजे या गावीदेखील असत.

या मठामध्ये विविध काळी अनेक सत्पुरुषांचे वास्तव्य घडलेले आहे. श्री हंसराज स्वामी, श्री दासगणु महाराज हे संत नियमितपणे डोमगावला येत असत. श्री दासगणु महाराजांनी ज्यांच्याकडून अनुग्रह घेतला होता ते श्री वामनशास्त्री इस्लामपूरकर कल्याण

स्वामी शिष्य परंपरेतील होते. थोर समर्थ भक्त श्री आण्णाबुवा कालगावकर तरुणपणी कांही काळ डोमगाव येथे होते. पुढे शंकराचार्य झालेले श्री कल्याणसेवक महाराज साधनेसाठी श्री कल्याण स्वामी समाधी मंदीरामध्ये राहिले होते.

श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांना ज्यांनी त्यांचे सद्गुरु श्री तुकाराम चैतन्य महाराजांकडे पाठवले ते रामकृष्ण स्वामी हे श्री कल्याण स्वामी परंपरेतील होते. ती परंपरा अशी **श्री समर्थ रामदास स्वामी - श्री योगीराज कल्याण स्वामी - श्री बाळकृष्ण स्वामी - श्री चिंतामणी स्वामी - श्री रामकृष्ण स्वामी.** श्री गोंदवलेकर महाराजांच्या प्रवचनामध्ये कल्याण स्वामींचा अल्लेख आढळतो.

'दासविश्रामधाम' या ग्रंथाला रामदासी सांप्रदायाचा विश्वकोष म्हटले जाते. त्या ग्रंथाचे कर्ते श्री आत्माराम स्वामी हे कल्याण शिष्यपरंपरेतील होते. ती परंपरा खालील प्रमाणे **श्री समर्थ रामदास स्वामी - श्री कल्याण स्वामी - श्री शिवराम स्वामी - श्री रामचंद्र स्वामी - श्री आत्माराम स्वामी.** प. प. भगवान श्रीधर स्वामी यांच्या माता-पित्यांनी डोमगांव परंपरेमधील श्री दत्तात्रय बुवा यांचेकडून अनुग्रह घेतला होता. श्री अनंतदास रामदासी महाराज प्रतीवर्षी डोमगांव ते सज्जनगड अशी पालखी घेऊन जात.

इ. स. १८०८ मध्ये मंदीरामधील ओवऱ्यांचे बांधकाम कलेढोणकर इनामदार यांनी केले. मंदीरामध्ये इ. स. १९१४ ते १९१८ या कालावधीमध्ये तत्कालीन मठपती श्रीरामबुवा जहागिरदार यांनी भव्य लाकडी सभामंडप बांधला. श्री कल्याण स्वामींची जपमाळ आणि त्यांनी पूजन केलेले रामपंचायतन डोमगांव येथे श्री भाऊसाहेब महाराज जहागिरदार यांच्याकडे आहे.

श्री कल्याण स्वामी आपल्या दंडावर मारुती बांधत असत. त्यांच्या निर्याणानंतर हा मारुती परंड्याचे देशमुख यांनी घेतला. सध्या ती मारुती प्रतीमा त्यांचे वंशज जयराम व प्रसाद देशमुख (गोले) यांचेकडे आहे. या मारुतीचा आकार २.५ इंच x २.५ इंच आहे. यावरुन श्री कल्याण स्वामींच्या बलदंड शरीराची कल्पना येते.

धुळे येथील श्री समर्थ वाग्देवता मंदिराचे संस्थापक, समर्थहृदय श्री शंकर श्रीकृष्ण देव हे अनेक दिवस डोमगाव येथे येऊन राहिले होते. त्यांनी संपूर्ण दासबोध लिहून घेतला व नंतर तो प्रसिद्ध केला. धुळे येथे डोमगाव मठातून मिळालेली अनेक बाडे आजही पहायला मिळतात. त्याचप्रमाणे इतिहास संशोधक श्री दत्तो वामन पोतदार, श्री बाबासाहेब पुरंदरे हे देखील डोमगावला येवून गेले आहेत.

मठामध्ये प्रतिवर्षी रामनवमी, दासनवमी, हनुमान जयंती, श्री कल्याण स्वामी पुण्यतिथी इत्यादि उत्सव होतात. सध्या मठाचे मठपती श्री अविनाशबुवा जहागिरदार हे आहेत.

सध्या डोमगाव येथील समाधी मंदीर चहू बाजुंनी पाण्याने वेढलेले आहे. सीना-कोळेगाव धरण प्रकल्पामुळे जुने डोमगाव पाण्याखाली गेले असून नवीन पुनर्वसन झाले आहे. डोमगाव येथील सीना - कोळेगाव प्रकल्पाच्या जलसाठ्याला **'कल्याणसागर'** असे नांव देण्यात आले आहे. परंड्यापासून ८ कि.मी. अंतरावर डोमगाव व तेथून ३ कि. मी. अंतरावर आतमध्ये श्री कल्याण स्वामी समाधी मंदीर आहे. तेथे जाण्यासाठी चांगला डांबरी रस्ता आहे.

*** डोमगावला जाण्याचे मार्ग :**

पुण्याहून -

पुणे - कुर्डूवाडी - परंडा - डोमगाव.

सोलापूरहून -

सोलापूर - बार्शी - परंडा - डोमगाव.

*** संपर्क :**

१) मठपती श्री अविनाशबुवा जहागिरदार, डोमगाव. मोबा. ९४२१४८१२२८

२) श्री अजय कुलकर्णी, बार्शी. मोबा. ९८८१७९३१६३

३) श्री सचिन अशोक जहागिरदार, बार्शी. मोबा. ९०९६३६३३४८

jahagirdarsa@gmail.com

*** संदर्भ ग्रंथ :**

१) श्री आत्माराम स्वामी कृत 'दासविश्रामधाम'

२) श्री गणेश शंकर देव यांचे 'समर्थशिष्य कल्याण'

३) वेबसाईट - www.dasbodh.com

# श्री कल्याण स्वामींची आरती

भवहरणा सुखकरणा निजस्मरणा वरदा ।
तव चरणांप्रति शरणांगत करुणानिरदा ।
न कळे लिळा विग्रह निगमागमवादा ।
स्थावर जंगम या नातळसी भेदा ।।१।।

जय देव जय देव जय जय कल्याणा ।
भावातीतानंता सहजा परिपूर्णा ।।धृ।।

हरिहर ब्रह्मादिका न कळे पदमहिमा ।
विंसीत शत रसना ही नेणे तव सीमा ।
कुंठीत होये वाचा नाकळवे निगमा ।
पुरुषोत्तम तव कृपे विगळीत रुप नामा ।।२।।



## ।। नमस्कार साष्टांग कल्याण स्वामी ।।

कल्याणाचे नाम कल्याणकारी ।
कल्याणाचे ध्यान सर्वांस तारी ।
कल्याणाचा हस्त माथा जयाचे ।
चारी मुक्ती वंदिती पाय त्याचे ।।१।।

कल्याण होणे जरी तूज आहे ।
कल्याण पायी मन स्थीर राहे ।
कल्याण वाणी पडता सुकानी ।
कल्याण जाले बहुसाल प्राणी ।।२।।

अविनाश हे नाम कल्याण ज्यांचे ।
करि सर्व कल्याण सर्वां जीवांचे ।
समर्थे जनी उतरायासी पारी ।
अशी ठेविली मूर्ति कल्याणकारी ।।३।।

श्रमहरणीतटाकी स्वामी कल्याण राजा ।
परम दीनदयाळू नांदतो स्वामी माझा ।
सदय हृदय ज्यांचे ध्यान हे आठवितां ।
परम सफल होते मोक्ष कल्याण हाता ।।४।।

बहू मतमतांतरे दाटी जाली ।
तयाचे पदी वृत्ती निवृत्ती ठेली ।
जगज्जीवनाचा प्रभू जो अनामी ।
नमस्कार साष्टांग कल्याण स्वामी ।।५।।

**।। जय जय रघुवीर समर्थ ।।**
**।। श्रीराम जय राम जय जय राम ।।**

# ।। पतित प्राणी पदा लागुनी कल्याण झाले ।।

प्राचीन श्रृतीमधील धौम्य-आरुणी तसेच रामायणातील वसिष्ठ-श्रीराम किंवा नंतरचे मत्स्येंद्र-गोरक्ष असा गुरु शिष्य परंपरेचा गंगौघ आपल्या भारत भूमिमध्ये अविरत प्रवाही आहे. अगदी अलीकडे म्हणजे वर्षांपूर्वी या परंपरेतील एक सुवर्णपर्व साकारले. समर्थ रामदास स्वामी आणि त्यांचे शिष्योत्तम कल्याण स्वामी म्हणजे अद्वैताचे रोकडे प्रमाण. **''याचेनि योगे मज बहु विश्रांती''** असे समर्थ रामदास स्वामी कल्याण स्वामींच्या बद्दल म्हणतात. कल्याण स्वामी समर्थांचे बहीश्चर प्राण होते असे ग्रंथ सांगत आहेत. रामघळीमध्ये सर्पदंश झाल्यावर समर्थांनी कल्याण स्वामींसाठी तेथील श्री भैरवनाथाला नवस केला होता. धन्य ते कल्याण स्वामी ज्यांच्यासाठी समर्थांनी नवस केला.

रोज १२०० सूर्यनमस्कार आणि अखंड चालणारा रामनामाचा अजपा-जप, महावाक्य पंचीकरणातील वेदांत आणि सज्जनगडावरील पाण्याचे हंडे, दासबोधाची हस्तलिखित प्रत आणि योगपट्ट बांधून योगमुद्रेमध्ये बसलेले कल्याणस्वामी यांचेकडे थोडे विचारपूर्वक पाहिले असता त्यांनी समर्थांचे तत्वज्ञान किती अचूकपणे धारण केले होते हे कळते. समर्थांच्या समाधीनंतर सर्वार्थाने ज्येष्ठ असून देखील ते सर्वांपासून अलिप्त राहून समर्थ कार्य करत राहिले. मात्र एका पत्रात ते लिहितात -

**''कलहामुळे श्रींच्या धर्मस्थापनेस अंतर पडेल ऐसे न करणे.''**

हा बोध आपणा सर्वांसाठी आहे.

जवळ जवळ वयाच्या पन्नाशीला आल्यावर कल्याण स्वामी डोमगांवला आले. त्यानंतर तिथे त्यांनी केलेल्या समर्थ कार्याच्या खुणा आजही गावागावात सापडतात. ती परंपरा आजही अखंडित आहे.

समर्थांच्या अस्थिविसर्जनाचा योग साधून त्याचबरोबर पंचतत्वात विलीन होणारे कल्याण स्वामी म्हणजे गुरुभक्तीची परिसीमा होय. ज्यांच्या अस्थींमधून 'विठ्ठल विठ्ठल' नामाचा गजर चालू होता असे श्री संत चोखामेळा काय किंवा श्री कल्याण स्वामी काय यांची दिव्य चरित्रे पाहून बुद्धी खुंटते. शब्द तोकडे पडतात.

आजही सज्जनगडावर समर्थांच्या समाधीसमोर 'श्रमहरणी निवास माझे कल्याण माये ।' हे भजन म्हटले जाते. ती श्रमहरणी सीना नदी, त्यांचे समाधीस्थान डोमगाव, त्यांच्या वास्तव्याने पुनीत झालेला तो परिसर यांना तीर्थक्षेत्रत्व प्राप्त झाले आहे.

आपले चरित्र श्री कल्याण स्वामी चरणी लागले की सर्वांचे कल्याण होईल असा स्वामींचा आशीर्वाद आहे.

।। पतित प्राणी पदा लागुनी कल्याण झाले ।।